अहिल्यानगर जिल्हा कारागृह, नारायणडोह या प्रस्तावित नविन कारागृहाकरिता संपादीत करण्यात आलेल्या क्षेत्राच्या मोबदला खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक: जेएलएम ०२२५/प्र.क्र.३८/तुरुंग-२**

**दुसरा मजला, मुख्य इमारत,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२५.

**संदर्भ-**

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. इप्रवि/नारायणडोह/नविनकारागृह/अनुदानमागणी/९९४५/२०२४/कक्ष क्र.६ (२) पुणे-१,दिनांक २.१२.२०२४.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५.
३. गृह विभाग, शासन निर्णय क्र. ०६२३/प्र.क्र.१००/तुरुंग-२, दिनांक ५.१२.२०२३.
४. गृह विभाग, शासन निर्णय क्र.जेएलएम०२२५/प्र.क्र.३८/तुरुंग-२, दिनांक ११.३.२०२५.

**प्रस्तावना-**

अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या संदर्भ क्र.१ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रस्तावित अहमदनगर (अहिल्यानगर) जिल्हा कारागृह, नारायणडोह करिता संपादीत करण्यात आलेल्या क्षेत्राचा मोबदला खर्च अदा करण्यासाठी प्रशासकीय मंजूरी देण्यात आली होती. तथापि, संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन सुधारित आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय-**

अहिल्यानगर जिल्हा कारागृह, नारायणडोह या प्रस्तावित नविन कारागृहाकरिता संपादीत करण्यात आलेल्या भूक्षेत्राच्या मोबदला खर्चास खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कारागृहाचे नाव | अनुदान आवश्यकतेचे कारण | रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | अहिल्यानगर जिल्हा कारागृह, नारायणडोह | गट क्र.४६९ मध्ये निवासी व कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणेसाठी भुसंपादन या सार्वजनिक प्रयोजनासाठी खाजगी क्षेत्रातील मौजे निंबोडी ता.जि. अहिल्यानगर येथील संपादीत करण्यात आलेल्या क्षेत्राचा मोबदला अदा करण्यासाठी (खाजगी भुखंडाकरिता) | रु.८,७२,४७१/- |
| **एकूण (अक्षरी रुपये आठ लक्ष बाहत्तर हजार चारशे एकाहत्तर फक्त)** | | | **रु.८,७२,४७१/-** |

२.	यावरील होणारा खर्च सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशिर्ष २०५६ तुरुंग (००) (१०१) (०२) जिल्हा तुरुंग (२०५६ ००४४), १३- कार्यालयीन खर्च, या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व सदर अनुदान खर्चाबाबतचे मासिक विवरणपत्र व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

३.	सदर रक्कम आहरित करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अधीक्षक, अहिल्यानगर जिल्हा कारागृह, अहिल्यानगर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४.	हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६४/२०२५/ व्यय-८, दिनांक १२.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल २०१५ मधील परिच्छेद क्र.८ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२८१९२७१०२२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SEEMA TUSHAR SAWANT

Digitally signed by SEEMA TUSHAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=15a6230fe20fd947aa83047f5deb85c95659ceb098e76eb25dd802b0518e7d63, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9ED89E6C00B3FD549E02FB85DFE0767F96018A29CCAC79EC62AAFD247DECECE8, cn=SEEMA TUSHAR SAWANT
Date: 2025.03.28 19:28:06 +05'30'

**(सीमा तु. सावंत)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परीक्षा, मुंबई,
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधीक्षक, अहिल्यानगर जिल्हा कारागृह, अहिल्यानगर,
१०. कक्ष अधिकारी, अर्थ-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती, तुरुंग -२ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

//**//